**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**
**(राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२४०६/ई-ऑफिस क्र.७८७०३८/विशि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०२ जुलै, २०२४.

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीबीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीबीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३०.०६.२०२०.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.उशिसं/२०२४/रातुमनावि/अधिसंख्य पद/विशि-१, दि.१४.०५.२०२४.

**प्रस्तावना:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ (चेअरमन अँड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बलराम बहिरा व इतर) व इतर याचिकांमध्ये दि.०६.०७.२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने याचिका क्र.३१४०/२००८ मध्ये दि.२८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. मा. उच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेता, मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची राज्यात अंमजबजावणी करण्यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये निर्देश देण्यात आले आहेत. तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या दि.३०.०६.२०२० च्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिनस्त असलेल्या राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठात अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्ती मिळवलेल्या तथापि, सदर प्रवर्गाची जात वैधता सादर करू न शकणाऱ्या कर्मचाऱ्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण यांनी दि.१४ मे, २०२४ च्या पत्रान्वये सादर केला आहे. त्यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१ डिसेंबर, २०१९ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१ (अ) ते (इ) मध्ये नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.३०.०६.२०२० च्या शासन निर्णयान्वये अशा कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदांवर वर्ग करण्याचे आणि त्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर येथे मूळ अनुसूचित जमातीच्या राखीव संवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, अनुसूचित

जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न करू शकलेल्या खालील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यास व सदर अधिसंख्य पदावर त्यांच्या सेवा वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | मूळ नियुक्तीचे पद | प्रथम नियुक्ती दिनांक | अधिसंख्य पद संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती रोशनी अनिल शेगावकर | कनिष्ठ ग्रंथालय सहायक | दि.३१.०१.१९९४ | १ |
| २ | श्री. रमेश कृष्णराव किटाडीकर | लघुटंकलेखक | दि.१८.०२.१९९४ | १ |
| ३ | श्री.नितीन वसंत विश्वकार | कनिष्ठ अभियंता (कार्यव्यापी) | दि.०७.१२.१९९५ | १ |

२. सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा क्र.१ येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.४.२ आणि त्यासोबतचे परिशिष्ट-ड येथील तरतुदीनुसार वरील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्यांना तात्पुरती नेमणूक देण्याचे आदेश राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाने निर्गमित करावे.

३. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीबीसी-२०२०/प्र.क्र.१८७/अे/१६-ब, दि.३०.०६.२०२० अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७०३१२४१३३५१०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANDESH RAJARAM UTEKAR

Digitally signed by SANDESH RAJARAM UTEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A98DB55C25ABAA2B7FE0A5F9D090F310D08C3FA1A1AF8D527E486E2673087F8C, cn=SANDESH RAJARAM UTEKAR
Date: 2024.07.03 12:53:09 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
६) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) विभागीय सहसंचालक, नागपूर विभाग, नागपूर.
९) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.
१०) निवड नस्ती (विशि-१).